**शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेल्या प्रवासभत्ता व दैनिक भत्त्याच्या दरात सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग.**

**शासन निर्णय क्रमांक : प्रवास-१०९८/प्र.क्र.७४/९८:सेवा-५,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ४ डिसेंबर,१९९९**

पहा :
(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :टीआरए-१०७७/१५६-सी/एसईआर-५, दिनांक ११ ऑगस्ट,१९७७
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : आरपीएस-१२८८/५६८/सेवा-१०, दिनांक ३ ऑक्टोबर, १९८८
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: : प्रवास-१०९२/सीआर-५९/सेवा-५, दिनांक १ एप्रिल,१९९२.
(४) शासन निर्णय, वित्त विभाग , क्रमांक : प्रवास-१०९२/प्र.क्र.१८८/सेवा-५, दिनांक २१ ऑक्टोबर,१९९२.
(५) केंद्र शासन वित्त, मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्रमांक : एफ क्र. १०/२/९८-आयसी व एफ क्र. १९०३०/२/९७-ई. चार, दिनांक १७ एप्रिल, १९९८.

## शासन निर्णय

पाचव्या केंद्रिय वेतन.आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने केंद्र शासनाने केंद्र शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेल्या प्रवास भत्त्याच्या दरामध्ये वर अ.क्र. ५ मध्ये नमूद केलेल्या दिनांक १७ एप्रिल, १९९८ च्या आदेशान्वये सुधारणा केली आहे. शासकीय कर्मचा-यांच्या प्रवास भत्त्याच्या दरात त्याप्रमाणे सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधिन होता. शासन आता असे आदेश देत आहे की, दौ-यावर व बदलीच्या वेळी प्रवास भत्त्याच्या नियमांतील विशिष्ट तरतूदी व दर खालील परिच्छेदात दर्शविल्याप्रमाणे सुधारण्यात यावेत. प्रवास भत्ता नियमांच्या/आदेशांच्या अन्य तरतूदी व वर निर्देशित केलेल्या शासन निर्णयांतील आदेश तसेच अमलात राहतील. शासन असेही आदेश देत आहे की, प्रवासभत्ता विषयक सर्व तरतूदी काटकसरीच्या उपाययोजना संबंधीच्या चालू तसेच भविष्यात काढल्या जाणा-या आदेशांच्या अधीन अंमलात राहतील.

२. ह्या आदेशांच्या प्रयोजनार्थ "वेतन " म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम १९९८ अन्वये लागू करण्यात आलेल्या सुधारीत वेतनश्रेणीतील मूळ वेतन, ज्यामध्ये कुंठीत वेतनवाढ/वेतनवाढींचाही समावेश असेल. परंतु जे कर्मचारी असुधारीत वेतनश्रेणीमध्ये वेतन घेतील त्यांच्या बाबतीत प्रवास भत्त्याची रक्कम परिगणित करताना त्यांचे असुधारीत वेतनश्रेणीतील मूळ वेतन, असल्यास कुंठीत वेतनवाढी व त्यावर दिनांक १ जानेवारी, १९९६ रोजी अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता आणि अंतरिम वाढ-१ व २ मिळून होणारी रक्कम विचारात घेण्यात यावी.

शामम्‌--रोटा--विवि--एच--920(20,000+15--12--99)1

३. **शासकीय कर्मचा-यांची वर्गवारी (मुंबई नागरी सेवा नियम [illegible]) :**

वर (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर १९८८ मधील परिच्छेद ३ मध्ये सुधारणा करुन, दौ-याच्या व बदलीच्या प्रवास भत्त्याच्या नियमनासाठी, शासकीय कर्मचा-यांच्या वर्गवारीकरीता वेतन मर्यादा खालीलप्रमाणे असतील :-

| श्रेणी | | सुधारीत वेतनश्रेणीतील वेतन |
|---|---|---|
| प्रथम श्रेणी | .... | रुपये १०,००० व त्याहून अधिक |
| द्वितीय श्रेणी | .... | रुपये ४,५०० ते ९,९९९ |
| तृतीय श्रेणी | .... | रुपये ४,५०० पेक्षा कमी. |

४. **निरनिराळया प्रवास साधनातील जागेच्या वर्गासाठीची पात्रता :**

वर (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर १९८८ मधील परिच्छेद ४ मध्ये अंशतः सुधारणा करुन शासकीय कर्मचा-यांची स्वेच्छानिर्णयानुसार दौ-यावरील व बदली निमित्ताच्या विमान प्रवासासाठी आणि रेल्वे, सार्वजनिक बसेस व आगबोट यांच्यावरील वेगवेगळया जागेच्या वर्गासाठीची पात्रता खालीलप्रमाणे असेल :

४.१ **विमान प्रवास (मुंबई नागरी सेवा नियम ४१७-ब आणि ४९०) :**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. प्रवास-१६८९/४८/८९/सेवा-५, दिनांक २९ ऑगस्ट १९८९, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. प्रवास-१६९३/१५९/सेवा-५, दिनांक ७ डिसेंबर, १९९३, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. प्रवास-१०९३/प्र.क्र.१४७/सेवा-५, दिनांक २७ मे, १९९४, शासन निर्णय, वित्त विभाग क्र. प्रवास-१०९४/प्र.क्र.१९६/सेवा-५, दिनांक १२ डिसेंबर, १९९४, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. प्रवास-१०९५/प्र.क्र.७७/सेवा-५, दिनांक १४ सप्टेंबर, १९९५ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.प्रवास-१६९६/प्र.क्र.२०१/सेवा-५, दिनांक २४ डिसेंबर १९९६ मधील आदेश अधिक्रमित करुन विमान प्रवासाविषयी पुढील तरतूदी लागू करण्यात याव्यात:

सर्व विभाग प्रमुख, त्यांचे वेतन विचारात न घेता व रु.१४,३०० आणि त्यापेक्षा अधिक मासिक वेतन घेणारे शासकीय कर्मचारी स्वेच्छा निर्णयानुसार दौ-यावर व बदलीनंतर सार्वजनिक क्षेत्रातील विमान सेवेने प्रवास करण्यास पात्र असतील.

टीप-१ : वर्ग-१ च्या शासकीय अधिका-यांना मुंबई-औरंगाबाद-जयपूर-दिल्ली व परत या विमान प्रवास इंडियन एअरलाईन्स कॉर्पोरेशनच्या विशिष्ट बोईंग सेवेमार्फत करण्यास देण्यात आलेली परवानगी यापुढेही तशीच चालू राहिल.

टीप-२ : ज्या शासकीय कर्मचा-यांना विमानाने प्रवास करण्यास पात्र समजण्यात आले आहे त्यांना "वायुदूत" विमान सेवेने यापुढेही प्रवास करण्याची परवानगी राहिल.

टीप-३ : विमान प्रवासासाठी "प्रथम" व "इकॉनॉमी" असे दोन वर्ग सध्या उपलब्ध आहेत. मंत्री, राज्यमंत्री आणि रु.२२,४००-५२५-२४५०० या व त्यापेक्षा वरच्या वेतनश्रेणीत वेतन घेणारे अधिकारीच केवळ "प्रथम" वर्गाने विमान प्रवास करण्यास पात्र समजले जातील.

टीप-४ : विभाग प्रमुखांनी आपल्या नियंत्रणाखालील रु.१०,००० व त्याहून अधिक पण रु.१४,३०० पेक्षा कमी मासिक वेतन घेणा-या कर्मचा-यांना शासकीय कामानिमित्त विमान प्रवास करण्यास परवानगी देताना संबंधित प्रशासकीय विभागाच्या सचिवांची आवर्जून पूर्व संमती घ्यावी.

टीप-५ : रु.२२,४००-५२५-२४५०० व त्यापेक्षा वरच्या वेतन श्रेणीत वेतन घेणा-या कर्मचा-यांना खाजगी विमान कंपनीने देशांतर्गत प्रवासासाठी आकारलेले पूर्ण विमान प्रवास भाडे अनुज्ञेय राहिल.मात्र मंत्रालयातील प्रशासकीय विभागाचे सचिव व त्या दर्जाचे अधिकारी, विभाग प्रमुख व रु.१४,३०० आणि त्याहून अधिक मासिक वेतन घेणा-या निम्न स्तरावरील शासकीय कर्मचा-यांना "संप वगैरे बाबींमुळे सार्वजनिक विमान सेवेची उड्डाने रद्द झाल्यामुळे अथवा सार्वजनिक विमान सेवेच्या अनुपलब्धतेमुळे मला खाजगी विमान सेवेच्या विमानाने प्रवास करावा लागला." असे प्रमाणपत्र प्रवास भत्ता देयकासोबत जोडण्याच्या अधिन राहून खाजगी विमानाने केलेल्या प्रवासावरील खर्चाची प्रतीपूर्ती त्या खाजगी विमान सेवेच्या सर्वात खालच्या वर्गाच्या भाडयाशी सीमित करुन अनुज्ञेय असेल. सचिव व त्या दर्जाचे अधिकारी आणि विभाग प्रमुखांच्या बाबतीत असे प्रमाणपत्र देण्यास ते स्वतः सक्षम राहतील व रु.१४,३०० व त्याहून अधिक मासिक वेतन घेणा-या निम्न स्तरावरील इतर कर्मचा-यांच्या बाबतीत असे प्रमाणपत्र त्यांना यथास्थिती आपल्या विभाग प्रमुखाकडुन/प्रशासकीय विभागाच्या सचिवांकडुन घेणे आवश्यक राहील. मात्र आणखी असे की, बदलीनंतरच्या प्रवासासाठी कोणत्याही कर्मचा-यास खाजगी विमान सेवेचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

टीप-६ : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःएमआयएन-१०८५/२३८८/(५९१)/२१, दिनांक ७ जानेवारी १९८६ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.प्रवास-१०९४/११०/सेवा-५, दिनांक २६ सप्टेंबर १९९४ मधील मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांच्या आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या विमान प्रवासास मंजूरी देण्याबाबतच्या विद्यमान तसेच भविष्यात करण्यात येणा-या तरतूदी यापुढेही तशांच चालू राहतील.

४.२ <u>रेल्वे प्रवास (मुंबई नागरी सेवा नियम ४०० आणि ४१०) :</u>

दौ-यावर व बदलीनंतर, रेल्वे प्रवासासंबंधीची पात्रता वेतन मर्यादेनुसार पुढीलप्रमाणे असेल. :

"तक्ता-अ"

| श्रेणी | वेतन मर्यादा | प्रवास पात्रता<br>ऑर्डिनरी मेल,एक्सप्रेस पॅसेंजर ट्रेन आणि अन्य सुपर फास्ट ट्रेन्स |
|---|---|---|
| प्रथम श्रेणी | अ) रु.१६४०० व त्याहून अधिक | वातानुकुलित प्रथम वर्ग/ द्वितीय वर्ग वातानुकुलित २-स्तर शयनयान. |
| | ब) रु.१००००-१६३९९ | द्वितीय वर्ग वातानुकुलित २-स्तर शयनयान/प्रथम वर्ग/ वातानुकुलित खुर्ची यान. |
| द्वितीय श्रेणी | अ) रु.७,५००-९,९९९ * | प्रथमवर्ग/द्वितीय वर्ग वातानुकुलित ३-स्तर शयनयान/ वातानुकुलित खुर्ची यान. |
| | ब) रु.४५००- ७४९९ ** | द्वितीय वर्ग शयनयान. |
| तृतीय श्रेणी | रु.४५०० पेक्षा कमी | द्वितीय वर्ग शयनयान |

* टीप :-१) वेतन मर्यादेतील अधिकारी, प्रवासाचे सुरुवातीचे व शेवटचे ठिकाण अखंडीतपणे व सर्वात जवळच्या मार्गाने जोडणा-या कोणत्याही रेल्वेमध्ये त्यांना अनुज्ञेय ठरविण्यात आलेले वर्ग उपलब्ध नसल्यास, द्वितीय वातानुकूल २-स्तर शयनयानाने प्रवास करण्यास मात्र असतील.

**टीप:-२) वेतन मर्यादेतील राजपत्रित अधिकारी, प्रथम वर्गाने/द्वितीय वर्ग वातानुकुलीत ३-स्तर शयनयानाने/ वातानुकुलित खुर्ची यानाने प्रवास करण्यास पात्र असतील.

" तक्ता-ब "

| श्रेणी | वेतनमर्यादा | प्रवास पात्रता | |
|---|---|---|---|
| | | राजधानी एक्सप्रेस | शताब्दी एक्सप्रेस |
| प्रथम श्रेणी | अ)रु १६४०० व त्याहून अधिक | वातानुकुलित प्रथम वर्ग/द्वितीय वर्ग वातानुकुलित २-स्तर शयनयान. | एक्झिक्युटीव्ह क्लास |
| | ब)रु १०००० - १६,३९९ | द्वितीय वर्ग वातानुकुलित २-स्तर शयनयान. | वातानुकुलित खुर्ची यान |
| द्वितीय श्रेणी | रु. ७५००-९९९९ * | वातानुकुलित खुर्ची यान. | ------ |

*टीप-१ :- वेतन मर्यादेतील अधिकारी, वातानुकुलित खुर्चीयान पुरविलेले नसल्यास वातानुकुलीत ३ स्तर शयनयानाने प्रवास करण्यास पात्र असतील.

टीप-२ :- जेव्हा भोजनाची व नाश्त्याची विनामुल्य सोय असलेल्या कोणत्याही गाडीने प्रवास केला जाईल तेव्हा प्रवास कालावधीचा ५०% दैनिक भत्ता शासकीय कर्मचा-यांच्या प्रवास भत्ता देयकातून कमी केलाजाईल.

तात्काळ आरक्षण शुल्क : रेल्वेच्या विशिष्ट गाडयांसाठी तात्काळ आरक्षण सुविधा आता उपलब्ध झाली आहे. यापुढे अत्यंत तातडीच्या परिस्थितीत कार्यालयीन कामकाजाकरिता प्रवासासाठी आकारल्या जाणा-या तात्काळ आरक्षण शुल्काची प्रतिपूर्ती मुंबई ते दिल्ली, नागपूर व औरंगाबाद हया मार्गावरील प्रवासासाठी अनुज्ञेय राहील.

एजन्सी शुल्क : प्रवास भत्त्यावरील, मुख्यत्वे विमान प्रवासावरील खर्च कमी व्हावा म्हणून, ज्या कर्मचा-यांना स्वेच्छा निर्णयानुसार किंवा सचिवांच्या पूर्वपरवानगीने विमान प्रवास अनुज्ञेय आहे अशा कर्मचा-यांना यापुढे आरक्षणासाठी रेल्वेने परवाना दिलेल्या अधिकृत एजन्सीने आकारलेल्या ठराविक दराच्या शुल्काची प्रतीपुर्ती अनुज्ञेय राहिल.

४.३ सार्वजनिक वाहनातून खुष्कीच्या मार्गाने प्रवास ( मुंबई नागरी सेवा नियम ४१४ आणि ४९० ) :

| अ.क्र. | वेतन मर्यादा | प्रवास भत्त्याची पात्रता |
|---|---|---|
| १ | रु. १०००० आणि त्याहून अधिक | वातानुकुलित बससहित इतर कोणत्याही प्रकारच्या सार्वजनिक बसचे प्रत्यक्ष भाडे |
| २ | रु. ४५०० पेक्षा अधिक परंतु रु. १०००० पेक्षा कमी | वातानुकुलित बसखेरीज इतर कोणत्याही प्रकारच्या सार्वजनिक बसचे प्रत्यक्ष भाडे. |
| ३ | रु. ४५०० पेक्षा कमी | सर्वसाधारण सार्वजनिक बसचे प्रत्यक्ष भाडे. |



एच–920(20,000+15–12–99)2–अ.

४.४ **आगबोटीने प्रवास (समुद्र आणि नदी) ( मुंबई नागरी सेवा नियम ४०६ आणि ४१० ) :**

समुद्र अथवा नदीवरील आगबोटीच्या प्रवासासाठी पात्रता खालीलप्रमाणे असेल :-

| श्रेणी | वेतन मर्यादा | समुद्र किंवा नदीवरील आगबोटीच्या वर्गाची पात्रता |
|---|---|---|
| प्रथम श्रेणी | रु. १०००० व त्याहून अधिक | उच्चतम वर्ग |
| द्वितीय श्रेणी | अ) रु. ७५००-९९९९<br>ब) रु. ४५००-७४९९ | दोन वर्गातील वरचा, तीनमधील मधला वर्ग, चार मधील दुसरा.<br>दोन वर्गातील खालचा, तीनमधील मधला वर्ग,चारमधील तिसरा. |
| तृतीय श्रेणी | रु. ४५०० पेक्षा कमी | अगदी खालचा वर्ग |

४.५ : रेल्वेने जोडलेल्या अथवा न जोडलेल्या दोन विवक्षित ठिकाणांदरम्यान वाहतुक अधिका-यांनी दर प्रमाणित केलेल्या टॅक्सीमधील एक सीट भाडयाने घेतल्यास अशा प्रकरणी, जर ती दोन ठिकाणे रेल्वेने जोडलेली असतील तर आलेला प्रत्यक्ष खर्च संबंधितास त्या मार्गावर उपलब्ध असलेल्या रेल्वेच्या अनुज्ञेय वर्गाच्या भाडयाशी सिमित करुन आणि जर ती दोन ठिकाणे रेल्वेने जोडलेली नसतील तर सार्वजनिक परिवहन सेवेच्या त्या मार्गावर उपलब्ध असलेल्या अनुज्ञेय वाहनाच्या भाडयाशी मर्यादित करुन देण्यात येईल.

५. **किलोमीटर भत्ता (मुंबई नागरी सेवा नियम ४१४ (१) आणि (२) :-**

वर निर्देशिलेल्या (२) येथील शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर १९८८ मधील परिच्छेद ५ मध्ये बदल करुन, मालकीच्या अथवा भाडयाच्या वाहनातून * प्रवासासाठी किलोमिटर भत्त्याचे दर खालीलप्रमाणे यावेत.

| श्रेणी | वेतनमर्यादा | मोटार कार/जीप पेट्रोल | मोटार कार/जीप डिझेल | मोटार सायकल/ स्कूटर/ ऑटोरिक्षा | मोपेड/ लूना | अन्य वाहने |
|---|---|---|---|---|---|---|
| | रु. | रु. | रु. | रु. | रु. | रु. |
| प्रथम श्रेणी | १०००० व त्याहून अधिक ** | ५.०० | ३.०० | १.७० | ०.८० | -- |
| द्वितीयश्रेणी | अ) ७५००-९९९९ ** | ५ .०० | ३ .०० | १.७० | ०.८० | ०.४० |
| | ब) ४५००-७४९९ | --- | --- | १.७० | ०.८० | ०.४० |
| तृतीय श्रेणी | ४५०० पेक्षा कमी | --- | --- | --- | ०.८० | ०.४० |

*टीप-१ ) ज्या वेतन मर्यादेच्या समोर किलोमीटर भत्त्याचे दर दर्शविण्यात आले आहेत त्या वेतन मर्यादेतील अधिकारी त्या प्रकारचे वाहन बाळगण्यास पात्र समजण्यात येतील.



एच–920(20,000+15–12–99)3.

**टीप-२) वेतनगटातील अधिकारी टॅक्सीने प्रवास केल्यास स्तंभ ३ मधील दराने कि.मी भत्ता मिळण्यास पात्र असतील.

५-अ) **<u>आनुषंगिक प्रवासाचा खर्च -</u>**

**वर (१) येथे** उल्लेखिलेल्या वित्त विभाग दिनांक ११ ऑगस्ट १९७७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४ **मध्ये अशंतः सुधारणा** करुन शासन आता असे आदेश देत आहे की **दौ-यानिमित्त** करावयाच्या मुख्य प्रवासाच्या **अनुषंगाने करावयाचा** आनुषंगिक (म्हणजे कामाच्या ठिकाणापासून रेल्वे/विमान/बस स्थानकापर्यंतच्या व परत असा) **प्रवास शासकीय कर्मचा-यास** दौ-यासाठी अनुज्ञेय असलेल्या रेल्वे/सार्वजनिक बस सेवेच्या अनुज्ञेय वर्गाने करता येईल. **वरील वाहनांव्यातिरिक्त** इतर साधनांनी प्रवास केल्यास त्यासाठीचा प्रत्यक्ष खर्च हा त्या वाहनासाठी विहित केलेल्या **किमोमीटर** भत्त्याच्या दराशी सिमित करुन अनुज्ञेय ठरेल.

आनुषंगिक प्रवास खर्चाचा समावेश मूळ प्रवास भत्ता देयकातच करण्यात यावा.

६. **<u>रिकाम्या मोटारीची वाहतूक (मुंबई नागरी सेवा नियम ४६२) :-</u>**

वर (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर,१९८८ मधील परिच्छेद ६ मध्ये बदल करुन रिकाम्या मोटार वाहतुकीच्या भत्त्याचा दर रु. २.५० प्रति किलोमीटर करण्यात यावा. मात्र त्यासाठी येणारा खर्च, रेल्वेने/आगबोटीने अथवा अन्य वाहनाने वाहतुक करण्यासाठी येणा-या खर्चापेक्षा अधिक नसावा व शासकीय कर्मचा-याने स्वतः प्रत्यक्षात रेल्वेने किंवा आगबोटीने प्रवास केलेला असावा.

७. **<u>वाहनभत्ता (मुंबई नागरी सेवा नियम ३८८):</u>**

वर (२) आणि (४) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, अनुक्रमे दिनांक ३ ऑक्टोबर १९८८ च्या परिच्छेद ७ मध्ये आणि शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २१ ऑक्टोबर १९९२ च्या परिच्छेद १ मध्ये अंशतः बदल करुन त्यात नमूद करण्यात आलेले वाहन भत्त्याचे दर पुढीलप्रमाणे सुधारण्यात यावेत.

| **वाहन भत्त्याचे सुधारीत दर** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मासिक सरासरी किलोमीटर १. | मोटारकार पेट्रोल २. | मोटारकार डिझेल ३. | मोटार सायकल/ स्कूटर ४. | मोपेड/लुना ५ | सार्वजनिक वाहन ६. |
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| २०१-३०० | ३७५ | २८८ | १५० | १०६ | ९४ |
| ३०१-४५० | ५६३ | ४१३ | २२५ | १३१ | ११९ |
| ४५१-६०० | ८३८ | ६२५ | ३३८ | १५६ | १४४ |
| ६०१-८०० | १,१२५ | ८५० | ४५० | १८१ | १५६ |
| ८०१ व त्याहून अधिक | १,५०० | १,१२५ | ६०० | २३१ | १६९ |



एच–920(20,000+15–12–99)3–अ.

. **सायकल भत्ता (मुंबई नागरी सेवा नियम ३८९) :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:प्रवास-१०८९/प्र.क्र.२४५/सेवा-५, दिनांक ५ जुलै १९८९ मधील दर सुधारुन तो आता रु.३० करण्यात यावा.

. **दैनिक भत्ता (मुंबई नागरी सेवा नियम ४२०):-**

वर (३) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १ एप्रिल १९९२ च्या परिच्छेद १ मध्ये बदल करुन दैनिक भत्त्याच्या प्रयोजनार्थ सुधारित वेतनश्रेणी खालीलप्रमाणे असतील.

**तक्ता-१**

| | | | | | अनुसूचित दर आकारणा-या हॉटेलमधील वास्तव्यासाठी दैनिक भत्त्याचे दर. | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | श्रेणी | वेतन मर्यादा (रुपये) | सर्वसाधारण दर (रुपये) | विशेष दर मुंबई, पुणे नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती (रुपये) | सर्वसाधारण दर राज्यातील व राज्याबाहेरील (रकाना ६ मधील शहरे वगळून) इतर सर्व ठिकाणे (रुपये) | विशेष दर मुंबई, पुणे नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, दिल्ली व भारतातील इतर राज्यांच्या राजधानीची शहरे (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | (अ) प्रथम श्रेणी | १६४०० व त्याहून अधिक | ७८ | ८५ | २०५ | २२५ |
| | (ब) | १००००- १६३९९ | ७० | ८४ | १६० | १८० |
| २ | (अ) द्वितीय श्रेणी | ८५००- ९९९९ | ७० | ८४ | १६० | १८० |
| | (ब) | ६०००-८४९९ | ६० | ७५ | ११५ | १३५ |
| | (क) | ४५००-५९९९ | ५३ | ६८ | ७५ | १०० |
| ३ | तृतीय श्रेणी | ४५०० पेक्षा कमी | ४५ | ६० | ६० | ७५ |

टीप :- हॉटेल वास्तव्यासाठी दैनिक भत्त्याची मागणी करताना शासकीय कर्मचा-यास हॉटेलमध्ये राहण्याचा/ राहण्याचा व जेवणाचा आलेला प्रत्यक्ष खर्च, सर्वसाधारणपणे अनुज्ञेय असलेल्या दैनिक भत्त्याच्या रकमेपेक्षा अधिक आहे हे दर्शविणारी एकच पावती सादर करावी लागेल.

व--920(20,000+15--12--99)4.

## राज्याबाहेर अनुसूचित दर आकारणा-या हॉटेल व्यतिरिक्त इतरत्र वासव्यास असल्यास दैनिक भत्त्याचे दर

| अनु.क्र. | दौ-याचे ठिकाण | दैनिक भत्त्याचा दर |
|---|---|---|
| १ | दिल्ली | स्तंभ(३) मधील अ.क्र.१(अ)येथील उच्चतम वेतन मर्यादेतील कर्मचा-यासाठी रु. १५०. उर्वरित कर्मचा-यासाठी रु. १२५. |
| २ | भारतातील इतर राज्यांच्या राजधानीची ठिकाणे | स्तंभ(३) मधील अ.क्र. १ (अ) येथील उच्चतम वेतन मर्यादेतील कर्मचा-यासाठी रु. १२५. उर्वरित कर्मचा-यासाठी रु. ११०. |
| ३ | राज्याबाहेरील भारतातील इतर ठिकाणे | तक्ता एकच्या स्तंभ (५) मधील दैनिक भत्त्याचा विशेष दर. |

१०. **बदली प्रवास भत्ता ( मुंबई नागरी सेवा नियम ४९० ) :-**

**(अ) कुटुंबाची व्याख्या** महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्व साधारण शर्ती) नियम,१९८१ चा नियम ९ (१६):-

कुटुंब म्हणजे, यथास्थिती शासकीय कर्मचा-याबरोबर राहणारी त्याची पत्नी किंवा राहणारा तिचा पती आणि शासकीय कर्मचा-याबरोबर राहणारी आणि संपूर्णपणे त्याच्यावर अवलंबून असणारी औरस मुले व सावत्र मुले. याशिवाय, या संज्ञेत , शासकीय कर्मचा-याबरोबर रहात असतील आणि संपूर्णपणे त्याच्यावर अवलंबून असतील तर त्याचे आई-वडील, बहीण आणि अज्ञान भाऊ यांचा समावेश होतो.

टीप-१ :- या प्रयोजनार्थ "कुटुंब" या संज्ञेमध्ये एकाहून अधिक पत्नींचा समावेश होत नाही.

टीप-२ :- जर शासकीय कर्मचा-याच्या व्यक्तिगत कायदयाप्रमाणे, दत्तक मुलाला नैसर्गिक मुलाचा दर्जा देणा-या दत्तविधानास कायदेशिर मान्यता मिळालेली असेल तर ते दत्तक मूल औरस मूल म्हणून समजण्यात येईल.

स्पष्टीकरण :- १) कुटुंबात दिनांक १ मार्च,२००० या दिनांकापासून केवळ २ मुलांचा समावेश असेल, परंतु ही अट दिनांक २९ फेब्रुवारी,२००० पर्यंत २ पेक्षा जास्त मुले असलेल्या शासकीय कर्मचा-यास लागू असणार नाही. तसेच एकही मूल नसलेल्या आणि दिनांक २९ फेब्रुवारी २००० रोजी एक मूल असलेल्या परंतु पुढील प्रसुतीत एकापेक्षा जास्त मुलांचा जन्म झाल्यामुळे त्यांची संख्या दोनपेक्षा अधिक झालेल्या मुलांचाही समावेश असेल.

२) या प्रयोजनार्थ अविवाहित मुली, विधवा मुली व "गार्डीयन्स ॲन्ड वॉर्डस ॲक्ट, १८९०" खाली पालकत्व स्विकारलेले मुल जे शासकीय कर्मचा-यासोबत राहते व ज्यास शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबाचा सदस्य म्हणून मान्यता आणि विशेष मृत्युपत्राद्वारे औरस मुलाचा दर्जा दिला आहे अशा मुलाचाही समावेश होतो.

३)घटस्फोटीत, परित्यक्ता किंवा पतीपासून वेगळी आणि पालकासोबत राहणा-या आणि त्याच्यावर आर्थिक दृष्टया अवलंबित असणा-या विवाहित मुलींचाही समावेश आहे.

४)बहिणींमध्ये शासकीय कर्मचा-यासोबत रहाणा-या व त्याचेवर पूर्णपणे अवलंबित असणा-या विधवा बहिणी, ज्यांचे वडील हयात नाहीत किंवा असल्यास ते शासकीय कर्मचा-यावर अवलंबून आहेत, यांचाही समावेश आहे.

५)शासकीय कर्मचा-यासोबत राहाणा-या व त्याचेवर पूर्णपणे अवलंबित असणा-या सावत्र आईचाही समावेश आहे.

टीप :- या व्याख्येच्या प्रयोजनार्थ शासकीय कर्मचा-यावर पूर्णपणे अवलंबित व्यक्ती म्हणजे ज्यांचे दरमहा निवृत्तीवेतनासह सर्व साधनांपासूनचे उत्पन्न रु. १५५० पेक्षा अधिक नाही असा कुटुंबाचा सदस्य.

ब) **बदलीनिमित्त खाजगी/भाडयाच्या वाहनाने प्रवास (मुंबई नागरी सेवा नियम ४९०) :-**

रेल्वेने न जोडलेल्या ठिकाणांदरम्यान * बदली निमित्त खाजगी/भाडयाच्या वाहनाने केलेल्या प्रवासासाठी किलोमीटर भत्त्याची रक्कम - मुंबई नागरी सेवा नियम १९५९ मधील नियम ४९० खालील तरतूद अंशतः सुधारुन आता



एच–920(20,000+15–12–99)4–अ.

शासकीय कर्मचा-याने आणि / किंवा त्यांच्या कुटुंबियांनी बदली निमित्तचा प्रवास खाजगी/ भाडयाच्या वाहनाने केल्यास त्यास त्यासाठी आलेला प्रत्यक्ष खर्च आणि वरील परिच्छेद ५ मध्ये विहित केलेल्या किलोमीटर भत्त्याच्या दरानूसार खालीलप्रमाणे परिगणना करुन येणारी रक्कम यापैकी कमी असेल ती रक्कम अनुज्ञेय ठरेल.

| | | |
|---|---|---|
| १ | फक्त शासकीय कर्मचा-याने प्रवास केल्यास | किलोमीटर भत्त्याचा विहित दर |
| 2 | शासकीय कर्मचा-यासोबत कुटुंबातील एका सदस्याने प्रवास केल्यास | अतिरिक्त काही नाही |
| ३ | शासकीय कर्मचा-यासोबत कुंटुंबातील दोन सदस्यांनी प्रवास केल्यास | किलोमीटर भत्त्याच्या विहित दराच्या दुप्पट दर |
| ४ | शासकीय कर्मचा-यासोबत कुटुंबातील दोनपेक्षा अधिक सदस्यांनी प्रवास केल्यास | किलोमीटर भत्त्याच्या विहित दराच्या तिप्पट दर. |

*टीप :- दोन्ही ठिकाणे रेल्वेने जोडली असल्यास मात्र आलेला प्रत्यक्ष खर्च हा त्या मार्गावर रेल्वेच्या उपलब्ध असलेल्या अनुज्ञेय वर्गाच्या भाडयाशी सिमित करुन देण्यात येईल.

क) संयुक्त बदली अनुदान :- वर (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३.१०.१९८८ मधील आदेशात बदल करुन, शासन परिपत्रक , वित्त विभाग, क्रमांक - टीआरए-१७७०/६५४-७०/एस-३, दिनांक ११ एप्रिल,१९७२ मधील तरतूदी खालीलप्रमाणे अंशतः सुधारण्यात याव्यात.

वर उल्लेखित शासन निर्णयान्वये सध्या अनुज्ञेय असलेल्या ठोक रकमी बदली अनुदान व बांधाबांध भत्ता यांचे ऐवजी आता शासकीय कर्मचारी संयुक्त बदली अनुदान मिळण्यास पात्र असतील, परंतु त्यासाठी बदलीनंतर त्यांचे निवासस्थानात बदल होणे आवश्यक आहे.

| अ.क्र.<br>१. | बदलीचा प्रकार<br>२. | संयुक्त बदली अनुदानाचा दर<br>३. |
|---|---|---|
| १ | त्याच मुख्यालयात | मूळ वेतनाच्या १/३ इतकी रक्कम |
| २.अ) | नवीन व जुन्या मुख्यालयातील अंतर २० कि.मी. पेक्षा कमी असल्यास | मूळ वेतनाच्या १/३ इतकी रक्कम |
| ब) | नवीन व जुन्या मुख्यालयातील अंतर २० कि.मी. वा त्यापेक्षा अधिक असल्यास | मूळ वेतनाएवढी रक्कम |



एच--920(20,000+15-12-99)5

वर (१) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ ऑगस्ट ७७ मधील परिच्छेद २४ (II) अन्वये कर्मचा-यांना बदली निमित्तच्या प्रवासाठी मिळणारा दैनिक भत्ता व मुं.ना.से.नि. मधील तरतूदीनुसार अनुज्ञेय असलेला बदलीनिमित्तच्या आनुषंगिक प्रवासाचा (म्हणजे जुन्या व नव्या मुख्यालयाचे निवास स्थान आणि रेल्वे स्टेशन/बस स्थानक/विमानतळ या दरम्यानच्या प्रवासाचा किंवा त्याच मुख्यालयीच्या बदलीनंतरच्या प्रवासाचा ) खर्च आता संयुक्त बदली अनुदानात समाविष्ट झाल्याने वेगळा अनुज्ञेय ठरणार नाही.

ड) <u>वैयक्तिक सामानासाठी पात्रता</u> :

(१) <u>रेल्वे वाहतूक</u> :- वर (१) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ ऑगस्ट,१९७७ मधील परिच्छेद २४ (पांच) व (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर,१९८८ मधील परिच्छेद १० (क) येथे अंशतः बदल करुन वेतन मर्यादा आणि वैयक्तिक सामानाच्या वाहनाची पात्रता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे असेल. शासकीय कर्मचारी वैयक्तिक सामान स्वतःच्या जोखमीवर खालील तक्त्यातील रकाना ३ मध्ये दर्शविलेल्या मर्यादेपर्यंत मालगाडीने वाहून नेण्याचा प्रत्यक्ष खर्च मिळण्यास पात्र असेल. या प्रयोजनार्थ कुटुंब असलेला किंवा कुटुंब नसलेला असा भेदभाव राहणार नाही.

| श्रेणी<br>१. | वेतन मर्यादा<br>२. | वहनीय वैयक्तिक सामान<br>३. |
|---|---|---|
| प्रथम श्रेणी | रु. १६,४०० व त्याहून अधिक | मालगाडीने ६००० कि. ग्रॅ. किंवा ४ चाकांची पूर्ण वॅगन किंवा १ दुहेरी कंटेनर प्रत्यक्षात आरक्षित केलेली/केला असल्यास. |
| | रु.१०,०००-१६,३९९ | [illegible] ६००० कि.ग्रॅ. किंवा ४ चाकी पूर्ण वॅगन किंवा १ [illegible] प्रत्यक्षात आरक्षित केलेली/केलेला असल्यास |
| द्वितीय श्रेणी | रु. ८५००-९९९९ | मालगाडीने ६००० [illegible] चाकी पूर्ण वॅगन किंवा १ एकेरी कंटेनर [illegible] केलेली/केलेला असल्यास. |
| | रु. ४५००-८४९९ | मालगाडीने ३००० कि.ग्रॅ. |
| तृतीय श्रेणी | रु. ४५०० पेक्षा कमी | मालगाडीने १५०० कि.ग्रॅ. |

2) <u>खुष्कीच्या मार्गाने वाहतूक</u> :- दोन्ही ठिकाणे रेल्वेने जोडली असताना खुष्कीच्या मार्गाने शासकीय कर्मचा-याने वैयक्तिक सामान वाहून नेल्यास वैयक्तिक सामानाच्या वाहतूकीचा प्रत्यक्ष खर्च किंवा मालगाडीने वाहतुकीसाठी अनुज्ञेय असलेल्या खर्चाच्या 25 टक्के वाढीव रक्कम, यापैकी जो कमी असेल ते मिळण्यास तो पात्र असेल.



एच-920(20,000+15-12-99)5-अ.

3) **रेल्वेने न जोडलेल्या ठिकाणांमध्ये वैयक्तिक सामानाची वाहतुक :-**

जेव्हा शासकीय कर्मचारी आपले वैयक्तिक सामान रेल्वेने न जोडलेल्या ठिकाणांमध्ये खुष्कीच्या मार्गाने वाहून नेईल तेव्हा वैयक्तिक सामानाच्या वाहतूकीचा प्रत्यक्ष खर्च किंवा रेल्वेने अनुज्ञेय मणवजनासाठी आकारल्या जाणा-या वाहतूक शुल्काच्या सव्वापट रक्कम यापैकी कमी असेल ते मिळण्यास पात्र असेल.

तसेच वरील परिस्थितील शासकीय कर्मचा-यांना खुष्कीच्या मार्गाने वैयक्तिक सामान वाहून नेण्यासाठी खालील दराने कि.मी. भत्ता स्विकारण्याचा पर्याय निवडता येईल.

| वेतन मर्यादा<br>१. | अ-१/अ/ब-१ वर्ग शहरे<br>(रु. प्रति कि.मी.)<br>२. | इतर शहरे<br>(रु. प्रति कि.मी.)<br>३. |
|---|---|---|
| रु. ८५०० व त्यापेक्षा अधिक | ३०.०० | १८.०० |
| रु. ४५००-८४९९ | १५.०० | ९.०० |
| रु. ४५०० पेक्षा कमी | ७.६० | ४.६० |

टीप :- स्तंभ २ मधील किलोमीटर भत्त्याचा उच्च दर, अ-१/अ/ब-१ शहरांच्या (शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घमाम १०९८/ प्र.क्र. ८२ / ९८ / सेवा-५, दिनांक ११ डिसेंबर १९९८) हद्दीत एका ठिकाणाहून दुस-या ठिकाणी वैयक्तिक सामानाची वाहतूक केल्या प्रकरणी अनुज्ञेय असेल.

४) **वाहनाची वाहतूक** :- वर (२) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑक्टोबर,१९८८ मधील परिच्छेद १० (ड) मध्ये बदल करुन स्वयंचलीत वाहनाच्या वाहतूकीसाठीचे दर खालीलप्रमाणे असतील :-

रु. प्रति कि. मी.

| | | |
|---|---|---|
| अ) | मोटार कार | २.५० |
| ब) | मोटार सायकल/स्कूटर | ०.८० |
| क) | मोपेड/लूना | ०.४० |
| ड) | सायकल | ०.१५ |

टीप :- या शासन निर्णयातील परिच्छेद ५ मधील तरतुदीनुसार बाळगण्यास पात्र असणा-या वाहन प्रकारापैकी एका वाहनाच्या वाहतुकीचा खर्च अनुज्ञेय राहील. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ ऑगस्ट,१९७७ मधील रेल्वेने वाहनांची वाहतूक करण्याबाबतची तरतूद या पुढेही अंमलात राहील.

इ) **बदली होणा-या शासकीय कर्मचा-यांस अनुज्ञेय वर्गाचे अतिरिक्त भाडे :-**

बदलीनंतर नव्या मुख्यालयाच्या ठिकाणी शासकीय निवासस्थान न मिळाल्यामुळे कुटुंब जुन्याच मुख्यालयी ठेवल्याच्या प्रकरणी, नवीन मुख्यालयात रुजु होण्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या आत सर्वसाधारण बदली प्रवास भत्त्याशिवाय, नवीन मुख्यालय ते जुने मुख्यालय या दरम्यान जाता -येतांनांच्या दोन्ही प्रवासासाठी अनुज्ञेय वर्गाचे अतिरिक्त भाडे दयावयाची सवलत यापुढेही चालू राहील.



एच–920(20,000+15–12–99)6.

**फ) दुस-या शासनाकडील बदली ( मुंबई नागरी सेवा नियम ५०६-बी ) :--**

दुस-या शासनाकडे तात्पुरत्या बदलीवर असलेल्या शासकीय कर्मचा-यांना त्या शासनाकडील पदावर रुजु होण्यासाठी व परतीच्या प्रवासासाठी द्यावयाच्या प्रवास भत्त्याच्या बाबतीत त्यांची प्रवास भत्त्याची मागणी, उसनवारीवर घेणा-या शासनाच्या नियमानुसार किंवा या राज्य शासनाच्या नियमानुसार विनियमित करण्याबाबतचा विकल्प देण्याची तरतूद यापुढेही अंमलात राहील.

**११. अशासकीय सदस्यांचा प्रवास भत्ता ( मुंबई नागरी सेवा नियम खंड २ परिशिष्ट ४२-ए विभाग-एक)**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. टिआरए-१४७७/१०३२-सी/एसईआर-५, दि. २३ सप्टेंबर, १९७७ आणि शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. प्रवास-१४८८/प्र.क्र.८५/सेवा-५, दि. १४ मार्च, १९८८ चे आदेश रद्द करुन शासन आता असे आदेश देत आहे की, अशासकीय सदस्यांच्या प्रवासभत्ता व दैनिक भत्त्यासंबंधीच्या मुंबई नागरी सेवा नियम, खंड-२, परिशिष्ट ४२ (अे), विभाग १ मधील तरतूदी आता खालीलप्रमाणे सुधारण्यात याव्यात. त्या त्या प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखालील समित्या/मंडळ /आयोग वगैरेंवर अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीच्या आदेशात त्यांच्या प्रवासभत्त्याबाबत पुढील सुस्पष्ट असा स्वतंत्र परिच्छेद अंतर्भूत करण्यात यावा :

" राज्य /विभाग / जिल्हा स्तरावरील समिती / मंडळ/ आयोग यावर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांना रु. १६,४०० व त्याहून अधिक वेतन घेणा-या शासकीय कर्मचा-याच्या दराने प्रवासभत्ता व दैनिकभत्ता अनुज्ञेय असेल; मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकुलीत प्रथम वर्गाच्या प्रवास अनुज्ञेय असणार नाही. तालुका स्तरावरील समिती/ मंडळ/आयोग यावर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्याना रू.४५०० - ७४९९ हया वेतन श्रेणीतील शासकीय कर्मचायांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवासभत्ता मिळेल. हे सदस्य रु. ६०००-८४९९ हया वेतन मर्यादेतील शासकीय कर्मचा-याना अनुज्ञेय असलेल्या दराने दैनिक भत्ता मिळण्यास पात्र असतील. समिती/मंडळ/आयोग वगैरेंवर अशासकिय सदस्य म्हणुन नियुक्त झालेल्या आमदार /खासदार यांचा प्रवास भत्ता /दैनिक भत्ता ,शासन निर्णय ,वित्त विभाग, क्रंमाक -टीआरए -१४७० /१३१ /अठरा,दिंनाक २७ जानेवारी १९७१ मध्ये नमुद केल्याप्रमाणे आमदार व खासदार यांना विधानमंडळाच्या कामकाजासाठी अनुज्ञेय असलेल्या दराप्रमाणे नियमित केला जाईल ".

**सेवानिवृत्तीनंतर / मृत्युनंतर प्रवास भत्ता :-**

१२.परिच्छेद १० मधील बदली प्रवास भत्त्याच्या सुधारीत तरतुदी, सेवानिवृत्त शासकिय कर्मचारी व त्याचे कुटुंब किवा मृत शासकीय कर्मचा-याचे कुटुंब यांना लागू होतील.

**१३ अंमलबजावणीचा दिंनाक :-**

अ) हे आदेश दि. १. नोव्हेंबर, १९९९ पासून अंमलात येतील.मात्र अपवाद असा की, हे आदेश निर्गमित होण्यापुर्वी प्रवासासाठी अनुज्ञेय ठरविलेला मार्ग /वर्ग हया आदेशातील पात्रतेपेक्षा वरचा असल्यास त्यात कपात केली जाऊ नये. परंतु दिनांक ३१. ऑक्टोबर, १९९९ च्या मध्यरात्रीपासून सुरु झालेल्या दौ-यावरील/बदलीवरील प्रवास दिनांक १ नोव्हेंबर, १९९९ नंतर पूर्ण झाले तरीही त्यांचे नियमन हे आदेश अंमलात येण्यापूर्वी अस्तित्वात असलेल्या नियमानुसार



एच-920(20,000+15-12-99)6-अ.

अथवा आदेशानुसार केले जाईल. दिनांक १ नोव्हेंबर, १९९९ रोजी वा नंतर सुरु झालेल्या दौ-याची/बदलीची प्रवास भत्ता देयके जुने नियम किंवा आदेश या अन्वये भागविली गेली असल्यास ती पुन्हा विचारात घेतली जाऊ नयेत.

ब) दि. १ नोव्हेंबर, १९९९ पुर्वी ज्या शासकीय कर्मचा-यांची बदली झाली असेल किंवा जो सेवानिवृत्त झाला असेल त्यांचे कुटुंबिय आणि/किंवा वैयक्तिक सामान दिनांक १ नोव्हेंबर, १९९९ रोजी किंवा त्यानंतर परंतु नवीन मुख्यालयाच्या ठिकाणी त्याने कार्यभार स्विकारण्याच्या/सेवानिवृत्तीच्या तारखेपासून सहा महिन्याच्या आत हलविले असल्यास अशा प्रकरणी परिच्छेद १० मधील सुधारीत तरतूदी लागू असतील.

या निमित्त होणारा अतिरिक्त खर्च संबंधित विभाग/कार्यालय यांनी आपापल्या मंजूर अनुदानातून भागवावा.

मुंबई नागरी सेवा नियम, १९५९ मधील यासंबंधातील सध्याच्या तरतूदी हया आदेशाच्या मर्यादेपर्यंत दुरुस्त करण्यात आल्या आहेत, असे समजले जावे. या नियमांना औपचारिक दुरुस्ती यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे सह सचिव.

प्रति—

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
मंत्रालयीन सर्व विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा) मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
*प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड फाईल, वित्त विभाग-सेवा-5.
* पत्राद्वारे

---



एच- 920(20,000-15-12-99)7.